**सन २०२२-२३ मधील अर्थसंकल्पित तरतूदीचे**
**वितरण करणेबाबत.**
**डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजना**
**(सर्वसाधारण) (२४२५१००९)-३३ अर्थसहाय्य**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. पुरक ०६२२/ प्र.क्र. ७९/१८-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २५ मार्च, २०२३

वाचा :-

१. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, क्रमांक सीसीआर ०६१२/प्र.क्र.२६९/२-स, दिनांक ०३/१२/२०१२
२. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, क्रमांक संकीर्ण-०५२१/प्र.क्र.६०/१८-स, दिनांक ११/०६/२०२१
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.पूरक-२०२२/प्र.क्र.६६/अर्थ-३, दिनांक २९/०८/२०२२
४. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, क्रमांक अर्थसं-०६२२/प्र.क्र.८१/१८-स, दिनांक २३/०६/२०२२
५. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, क्रमांक अर्थसं-०६२२/प्र.क्र.८१/१८-स, दिनांक १०/१०/२०२२

प्रस्तावना :-

राज्यातील शेतकऱ्यांना सहकारी कृषी पत संस्थांमार्फत व्याज दरात वसुलीशी निगडीत प्रोत्साहनात्मक सवलत देण्याचा निर्णय शासनाने दिनांक २४/११/१९८८ च्या शासन निर्णयान्वये घेतला आहे. त्यानुसार दिनांक ०२/११/१९९१ च्या शासन निर्णयानुसार डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजना दिनांक ०१/०४/१९९० पासून पीक कर्ज घेतलेल्या शेतकऱ्यांना लागू करण्यात आली आहे. या योजनेअंतर्गत सहकारी कृषी पतसंस्थेकडून पीक कर्ज घेणाऱ्या व त्याची प्रतिवर्षी ३० जूनपर्यंत संपूर्ण परतफेड करणाऱ्या शेतकऱ्यांना व्याज सवलत देण्यात येत आहे. राष्ट्रीयकृत बँका, ग्रामीण बँका व खाजगी बँकांकडून कर्ज घेणाऱ्या शेतकऱ्यांनाही सदर योजना लागू आहे. मात्र थकीत कर्जास, तसेच, मध्यम मुदत व दीर्घ मुदत कर्जास सदरची योजना लागू नाही. या योजनेअंतर्गत शेतकऱ्यांना सहकारी कृषी पतसंस्थांमार्फत व बँकांमार्फत मिळणाऱ्या पीक कर्जावरील व्याज दराशी निगडीत व्याज सवलत देण्यात येत आहे. दिनांक ०३/१२/२०१२ रोजीच्या शासन निर्णयानुसार रूपये १.०० लाखापर्यंतच्या पीक कर्जावर वार्षिक ३% व त्यापुढील रूपये ३.०० लाखापर्यंतच्या पीक कर्जावर वार्षिक १% दराने व्याज सवलत लागू करण्यात आलेली होती. तसेच शासनाने दिनांक ११/०६/२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये रू. ३.०० लाख मर्यादेपर्यंत अल्प मुदत पीक कर्ज घेऊन त्याची मुदतीत परतफेड करणाऱ्या शेतकऱ्यांना केंद्र शासनाचे ३% व्याज सवलत विचारात घेऊन सदर कर्ज शेतकऱ्यांना शुन्य टक्के (०%) दराने उपलब्ध होणार आहे.

सन २०२२-२३ मध्ये रू. ९९६५८.०० लाख एवढे प्रस्ताव निधी अभावी प्रलंबित असल्यामुळे सन २०२२-२३ ची मंजूर अर्थसंकल्पीय तरतूद वगळता रू. ७६५००.०० लाखाची पुरवणी मागणी जुलै, २०२२ च्या पावसाळी अधिवेशनात सादर करण्यात आली होती. त्यापैकी रू.३००००.०० लाख इतकी मागणी मंजूर करण्यात आली आहे. त्यानुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

सन २०२२-२३ वर्षात डॉ.पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजनेअंतर्गत (२४२५ १००९)-३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली जुलै, २०२२ च्या पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे रू. ३००००.००

लाख एवढी रक्कम मंजूर करण्यात आली आहे. सदर रक्कमेपैकी नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने ५०% म्हणजेच रू.१५०००.०० लाख (रूपये एकशे पन्नास कोटी फक्त) एवढ्या निधीचे वितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर तरतूद संबंधित संस्थांना अदा करण्यासाठी V०००४-सहायक निबंधक (अर्थसंकल्प आणि नियोजन) आयुक्त, सहकार, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच लेखाधिकारी, अधिन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी आहरण करून हा खर्च किती वेळेत होईल हे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे. तसेच याबाबतचा अहवाल व विकास मंडळनिहाय खर्चाची माहिती वेळो वेळी शासनास पाठवावी.

३. सदरहू रक्कम मागणी क्र.व्ही - २ मुख्यलेखाशिर्ष " २४२५ सहकार - (१०७), सहकारी पत संस्थांना सहाय्य (०२) व्याजात सवलत (०२)(०४) डॉ.पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजना (कार्यक्रम) (दत्तमत) (२४२५१००९) ३३, अर्थसहाय्य ", या लेखाशिर्षाखालील सन २०२२-२३ या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून सदर रक्कम खर्च करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्र.१०७/ १४३१, दि. २०/२/२०२३ तसेच वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचे अनौपचारीक संदर्भ क्र. १९०/२०२३ / व्यय-२, दि. २५/०१/२०२२ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२५१४५५०१३३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Shrikrushna Anandrao Wadekar

Digitally signed by Shrikrushna Anandrao Wadekar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7305071c9d8b281074f8452b1a671851b99ce164d8bd282bfeb775611d0eb87e, pseudonym=A9B19E68D73171B69896843593789CD99AC6D8D5, serialNumber=2711D1231BE138057C3C88E0EFB4B1CD5177AA9E3C71FCD2EDF6EC025114EB89, cn=Shrikrushna Anandrao Wadekar
Date: 2023.03.29 15:55:07 +05'30'

**( श्रीकृष्ण वाडेकर )**

वि. का. अ. तथा सहनिबंधक, महाराष्ट्र शासन

**प्रत : माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित,**

१. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. महालेखाकार, महाराष्ट्र- १, मुंबई.
५. महालेखाकार, महाराष्ट्र- २, नागपूर.
६. समन्वयक, राज्यस्तरीय बँकर्स समिती, पुणे.
७. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक, लि. मुंबई.
८. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था.
९. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.
१०. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-१३, मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव (कार्या. १७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कोषागार अधिकारी, पुणे.
१३. निवड नस्ती-१८-स.